असुधारित वेतन संरचनेत (६ व्या वेतन आयोगानुसार) वेतन घेणाऱ्या राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय महागाई भत्त्याच्या दरात दिनांक १ जुलै, २०२४ पासून सुधारणा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मभवा-१३२४ /प्र.क्र.३४ /सेवा-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २५ फेब्रुवारी, २०२५

वाचा - भारत सरकार, वित्त मंत्रालय, व्यय विभाग कार्यालयीन ज्ञापन क्रमांक : १/६(१)/२०२४-इ. II (बी), दिनांक ७ नोव्हेंबर, २०२४

**शासन निर्णय -**

असुधारित वेतन संरचनेत (६ व्या वेतन आयोगानुसार) वेतन घेणाऱ्या राज्य शासकीय कर्मचारी व इतर पात्र पूर्णकालिक कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय महागाई भत्त्याच्या दरात सुधारणा करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

२. शासन असे आदेश देत आहे की, दिनांक १ जुलै, २०२४ पासून ६ व्या वेतन आयोगानुसार असुधारित वेतनसंरचनेतील मूळ वेतनावरील अनुज्ञेय महागाई भत्त्याचा दर २३९% वरुन २४६% करण्यात यावा. सदर महागाई भत्ता वाढ दिनांक १ जुलै, २०२४ ते दिनांक ३१ जानेवारी, २०२५ या कालावधीतील थकबाकीसह माहे फेब्रुवारी, २०२५ च्या वेतनासोबत रोखीने देण्यात यावी.

३. महागाई भत्त्याची रक्कम प्रदान करण्यासंदर्भातील विद्यमान तरतुदी व कार्यपध्दती आहे त्याचप्रकारे यापुढे लागू राहील.

४. यावर होणारा खर्च संबंधित शासकीय कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात, त्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून त्याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. अनुदानप्राप्त संस्था व जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांच्या बाबतीत, संबंधित प्रमुख लेखाशीर्षाखालील ज्या उप लेखाशीर्षाखाली त्यांच्या सहाय्यक अनुदानाबाबतचा खर्च खर्ची टाकण्यात येतो, त्या उप लेखाशीर्षाखाली हा खर्च खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२५१५५१४६१६०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VINAYAK ARVIND DHOTRE

Digitally signed by VINAYAK ARVIND DHOTRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=857ec0d4ffa11afd448c1db99e6d5447265170ecc87e6e5c74be1217bec62ba9, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=EED64FF5F3811D4C3522D8713ED9A9090E2A4F33552EEA2364D17D782C35E926, cn=VINAYAK ARVIND DHOTRE
Date: 2025.02.25 15:52:59 +05'30'

**( वि. अ. धोत्रे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. राज्यपालांचे सचिव
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

३. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव
४. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
५. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
६. विरोधी पक्षनेते विधानपरिषद/ विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
७. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन , मुंबई
८. सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
९. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
१०. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
१२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
१३. सिनियर रिसर्च ऑफीसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली
१४. मंत्रालयीन सर्व विभाग
१५. मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख
१६. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
१७. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
१८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१९. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२०. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
२१. आयुक्त, राज्य माहिती आयोग, (सर्व)
२२. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई
२३. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई/नागपूर/औरंगाबाद
२४. राज्य महिला आयोग, वरळी ,मुंबई
२५. सर्व विभागीय आयुक्त
२६. सर्व जिल्हाधिकारी
२७. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा
२८. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे
२९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
३०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
३१. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३२. सर्व कोषागार अधिकारी
३३. लेखाधिकारी, सर्व वेतन पडताळणी पथके,मुंबई/नागपूर/पुणे/औरंगाबाद
३४. मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका
३५. कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी/देहूरोड/देवळाली/अहमदनगर
३६. कुलसचिव, सर्व कृषि आणि कृषितर विद्यापीठे
३७. संचालक, स्थानिक निधी लेखा परीक्षा, मुंबई
३८. सहसंचालक, स्थानिक निधी लेखा परीक्षा, कोकण/पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती नागपूर

३९. बहूजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१
४०. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी. डी .ओ., बॅरॅक क्रमांक १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-२०
४१. भारतीय कम्युनिस्ट पार्टी,महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन,एस. व्ही. पटेल रोड, मुंबई-४
४२. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३
४३. इंडियन नॅशनल कॉँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉँग्रेस(आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५
४४. नॅशनलिस्ट कॉँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन,फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट,मुंबई-२१
४५. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८
४६. वित्त विभागातील सर्व कार्यासने
४७. निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-९)